**एकात्मिक मधमाशापालन प्रजनन व**
**<u>मध उत्पादन योजना</u>**

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांक : २००९/प्र.क्र.१०७/का.१४८३
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १५ एप्रिल , २०१०

**प्रस्तावना :**

देशातील डोंगराळ प्रदेशाच्या विकासास चालना देण्यासाठी राष्ट्रीय विकास मंडळाच्या शिफारशीनुसार १९७४-७५ या वर्षापासून महाराष्ट्र कर्नाटक, तामिळनाडू, केरळ व गोवा या राज्यामध्ये पश्चिम घाट विकासाचा केंद्र पुरस्कत कार्यक्रम सुरु करण्यात आला आहे. ज्या तालुक्यातील किमान २० टक्के क्षेत्र ६०० मीटर उंचीवर किंवा त्यापेक्षा जास्त उंचीवर आहे अशा क्षेत्राचा पश्चिम घाट क्षेत्रात समावेश करण्यात आलेला आहे. त्यानुसार राज्याच्या १२ जिल्हयातील ६३ तालुक्यांमध्ये पश्चिम घाट विकास कार्यक्रम राबविण्यात येत आहे.

या कार्यक्रमातंर्गत मधमाशापालन व्यवसायास प्रोत्साहन देण्यासाठी मधमाशापालन योजनेचा समावेश करुन या योजनेंतर्गत मधपेटया आणि मधयंत्रे खरेदीसाठी अनुदान, कर्ज आणि खेळते भांडवल देणे. मधमाशा निर्मीती केंद्राची स्थापना करणे व लाभार्थीना प्रशिक्षण देणे या घटकांचा समावेश करण्यात आला आहे. तसेच या कार्यक्रमांतर्गत मध उदयोगासाठी विस्तार केंद्र स्थापन करण्याचीही अनुमती देण्यात आली असून, लाभार्थीना रितसर प्रशिक्षण देण्यासाठी प्रशिक्षण केंद्राची स्थापना करणेसाठी इमारत बांधणे व मशिनरी खरेदी करणे इ. साठीदेखील या योजनेंतर्गत शासनाकडून वेळोवळी अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले आहे. मधमाशापालन व्यवसायाशी निगडीत असलेल्या सर्व घटकांचा समावेश असलेली सर्वसमावेशक योजना मंजूर नसल्याने सदर कार्यक्रम राबविण्यामध्ये अडचणी येत आहेत, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. यास्तव मधमाशापालन व्यवसायाशी निगडीत असलेल्या सर्व बाबींचा सर्वकश विचार करुन एकात्मिक मधमाशापालन व मध उत्पादन या योजनेचे स्वरुप निश्चित करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

पश्चिम घाट विकास कार्यक्रम कार्यक्षेत्रात येणा-या जिल्हयामध्ये तसेच राज्यात इतर ठिकाणी विविध

विभागामार्फत राबविण्यात येणा-या योजनेव्दारे मधमाशापालन व्यवसाय तसेच मध उत्पादनास मोठया प्रमाणावर चालना देण्याची गरज आहे. त्यासाठी पुढील प्रमाणे कार्यवाही करण्याबाबत सविस्तर सूचना देण्यात येत आहेत.

**कार्यान्वयीन यंत्रणा**

**२.** राज्यात विविध कार्यक्रमांतर्गत ही योजना महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोदयोग मंडळामार्फत राबविण्यात येत असून,यासाठी महाबळेश्वर येथे सन १९४७ साली मध संचालनालयाची स्थापना करण्यात आली आहे. संचालनालयामार्फत मधमाशा वसाहतीसह मधपेटया तसेच अन्य साहित्याचे लाभार्थ्याना वाटप करणे, मध संकलन, प्रक्रिया व विक्रीकरणे,मध उद्योगाशी निगडीत बाबीवर संशोधन करणे इ. कामे करण्यात येत आहेत. सबब प्रस्तुत योजना राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोदयोग मंडळ कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून काम करेल.

**३.** हा कार्यक्रम समूह किंवा एकसंघ खेडयाच्या गटामध्ये घेण्यात यावा. जेणेकरुन प्रशिक्षण,उत्पादन,संकलन प्रक्रिया व विक्री यामध्ये सुलभता येऊन योजनेची परिणामकारक अंमलबजावणी होऊ शकेल.

**योजनेचे मुख्य घटकः**

**४.** एकात्मिक मधमाशापालन व मध उत्पादन योजनाची प्रभावी अमलबजावणी करण्यासाठी मुबलक प्रमाणात मधमाशा वसाहती उपलब्ध होणे आवश्यक आहे. तसेच मधमाशा पालनाचा व्यवसाय करु इच्छिणा-या लाभार्थ्यांना योग्य ते प्रशिक्षण देऊन शास्त्रोक्त पध्दतीने मार्गदर्शन करणे आवश्यक आहे. याशिवाय राज्य पातळीवर मधुमक्षिका उद्योग उत्तम प्रकारे चालावा यासाठी त्यावर शंशोधन करणे, प्रशिक्षकांना प्रशिक्षण देणे, मधावर प्रक्रिया करणे, त्याची प्रतवारी तपासण्यासाठी राज्य स्तरावर एखाद्या संस्थेची आवश्यकता आहे. याचा विचार करून या योजनेंतर्गत खालील चार घटकांचा समावेश करण्यात येत आहे

घटक १ : राज्यस्तरीय मधमाशा संशोधन, प्रशिक्षण आणि विस्तार केन्द्राची स्थापना करणे.

घटक २ : प्रशिक्षण केंद्राची स्थापना व लाभार्थ्यांना प्रशिक्षण

घटक ३: मधमाशा वसाहती प्रजनन व पालन करणारे उद्योजक व मार्गदर्शक

घटक ४ : मधमाशापालन व्यवसाय लाभार्थी निवड, प्रशिक्षण मार्गदर्शन

**घटक १ : संशोधन, प्रशिक्षण आणि विस्तार केंद्राची स्थापना**

**५.** महाबळेश्वर येथे महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाचे मध संचालनालय असून या संचालनालयामार्फत मध उदयोगाशी संबंधीत बाबीवर संशोधन करुन मधमाशापालन व्यवसायाचा प्रचार व प्रसिध्दी करणे, लाभार्थीना प्रशिक्षण देणे, मध गोळा करणे, मधावर प्रक्रिया करणे, मधाची प्रतवारी तपासणे इ. कामे करण्यात येत आहेत. मधमाशापालन व मध

उदयोगाचा कार्यक्रम मोठया प्रमाणावर हाती घेण्यात येत असल्याने या केंद्रामधील सुविधांमध्ये वाढ करण्याची आवश्यकता असून, काही सुविधा नव्याने निर्माण करण्याचीही गरज आहे आणि त्यासाठी इमारत बांधकामही करावे लागणार आहे. इमारत

बांधणे, सुविधांमध्ये वाढ करणे, नव्याने सुविधा निर्माण करणे आणि त्या सुस्थितीत ठेवणे यासाठी होणारा खर्च या योजनेंतून भागविता येईल.

**घटक २ : प्रशिक्षण केंद्राची स्थापना व लाभार्थ्यांना प्रशिअक्षण.**

६. मधमाशापालन या व्यवसायाचा प्रसार होण्यासाठी विविध ठिकाणी या कार्याक्रमांतर्गात पुरेशा प्रशिक्षण केंद्राची स्थापना करणे आवश्यक आहे. या प्रशिक्षण केंद्राव्दारे खालील दोन प्रकारचे प्रशिक्षण देणे अपेक्षित आहे.

(अ) मधमाशांचे प्रजनन करण्यासाठी तसेच प्रशिक्षण केंद्र चालविण्यासाठी (परिशिष्ट **'अ'**प्रमाणे)

ब) मधमाशापालन व्यवसाय करण्यासाठी निवडलेल्या लाभार्थीना प्रशिक्षण. (परिशिष्ट **'ब'**प्रमाणे)

**७.** मधमाशांचे प्रजनन करण्यासाठी तसेच प्रशिक्षण केंद्र चालविण्यासाठीचे प्रशिक्षण प्रामुख्याो महाबळेश्वर येथे संशोधन, प्रशिक्षण आणि विस्तार केंद्रात देण्यात यावे. मधमाशापालन व्यवसाय करण्यासाठी ि-ावडलेल्या लाभार्थांाा प्रशिक्षण वरीलप्रमाणे प्रशिक्षीत केद्र चालकामार्फत देण्यात यावे. मधमाशापालन व्यवसायाचे शास्त्रोक्त पध्दतीने प्रशिक्षण विद्यापीठ यामध्ये देखील देता येईल.

**घटक ३: मधमाशा वसाहती प्रजनन पालन करणारे उद्योजक व मार्गदर्शक**.

**८.** एकात्मिक मधमाशापालन ,प्रजनन व मध उत्पादन योजना प्रभावीपणे राबविण्यासाठी राज्यातच मोठया प्रमाणावर मधमाशा वसाहतींची निर्मिती करणे, मधमाशा पालन व्यवसाय करणा-या लाभार्थ्यांना प्रशिक्षण देणे, मार्गदर्शन करणे, उत्पादित मध गोळा करुन त्यावर प्रक्रिया करुन तो विक्री करणे इत्यादी अतिशय महत्वाची कामे करावी लागणार असल्याने ही कामे सुयोग्य खाजगी उद्योजक/संस्था यांचेमार्फत करण्यात यावीत.

**९.** सदर उद्योजकाने/संस्थेने खालील प्रमाणे महत्वाची कामे करावयाची आहेत. :

(१) प्रजननाव्दारे पुरेशा मधमाशा वसाहती निर्माण करणे

(२) मधमाशा पालन व्यवसाय करु इच्छिणा-या लाभार्थ्यांना प्रशिक्षण देणे

(३) प्रशिक्षीत लाभार्थ्यांना मधमाशा वसाहती शासनाने ठरविलेल्या किंमतीस उपलब्ध करुन देणे.

(४) लाभार्थ्यांनी व्यवसाय सुरु केल्यानंतर त्यांना या केंद्रामार्फत वेळोवेळी मार्गदर्शन व सहाय्य करणे. मधमाशा व्यवसाय सुरु केलेल्या लाभार्थ्यांना कमीत कमी एक वर्ष मार्गदर्शन करणे.

(५) या वसाहतींमधून निर्मित झालेला मध विक्रीयोग्य होण्याच्या दृष्टीने त्यावर प्रक्रिया करण्यासाठी सुविधा पुरविणे /प्रक्रिया केलेला मध एकत्र करुन विक्री करणे.

**वैयक्तिक लाभार्थी/ संस्थांची निवड**

**१०.** मधमाशा वसाहतीचे प्रजनन व पालन करणारे उद्योजक व मार्गदर्शक तयार करण्यासाठी खाजगी व्यक्ती, उद्योजक / संस्था यांचेकडून खुल्या जाहिरातीव्दारे अर्ज मागविण्यात यावेत. या योजनेचा फलोत्पादन तसेच कृषी विभागाच्या अधिकारी व कर्मचा-यामार्फत तसेच ग्रामसेवकामार्फतसुध्दा ग्रामीण भागात व्यक्तीगत संपर्काव्दारे प्रचार व प्रसार करण्यात यावा. वैयक्तिक लाभार्थी/ संस्थांची पात्रता पुढीलप्रमाणे राहील.

**वैयक्तिक लाभार्थी उद्योजक पात्रतेच्या अटी**

(i) किमान एस.एस.सी.पास असावा.

(ii) वयोगट २१ ते ५० वर्षे असावा.

(iii) अशा व्यक्तीच्या नावे अथवा त्या व्यक्तीच्या कुटुंबातील कोणत्याही व्यक्तीच्या नावे किमान २ एकर शेत जमीन असावी.

(iv) लाभार्थीकडे मधमाशा पालन,पजनन व मध उत्पादनाबाबतीत लोकांना प्रशिक्षण देण्याची क्षमता असावी.

**संस्थेच्या पात्रतेसाठी अटी खालील प्रमाणे**

(i) संस्था नोंदणीकृत असावी व त्या कृषी क्षेत्रात कार्यरत असलेल्या कोणत्याही नोंदणीकृत संस्थेस असे केंद्र स्थापन करता येईल.

(ii) संस्था लगतची किमान मागील तीन वर्षे तरी फायदयात असली पाहीजे.

(iii) संस्थेच्या नावे मालकीची किंवा दहा वर्षासाठी भाडयाने घैंतलेली कमीत कमी २ एकर शेत जमीन असावी.

(v) प्रशिक्षण केंद्र चालविण्यासाठी संस्थेच्या नावे अथवा भाडयाने घेतलेली किमान ५०० चौ. फुट क्षेत्राची सुयोग्य इमारत असावी.

(vi) संस्थेकडे लैंकांना मधमाशा पालन,पजनन व मध उत्पादनाबाबतीत प्रशिक्षण देण्याची क्षमता असलेले कर्मचारी असावेत.

**११**. पात्र व्यक्ती / संस्था यांची निवड करण्यासाठी प्रत्येक जिल्हयासाठी खालील प्रमाणे जिल्हास्तरीय समिती स्थापन करण्यात यावी.

| | | |
|---|---|---|
| (१) | जिल्हाधिकारी/अपर जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| (२) | मुख्य कार्यकारी अधिकारी/अपर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| (३) | अधिक्षक,कृषी अधिकारी | सदस्य |
| (४) | उप वन संरक्षक किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| (५) | जिल्हा फलोत्पादन अधिकारी | सदस्य |
| (६) | जिल्हा ग्रामोद्योग अधिकारी,खादी व ग्रामोद्योग मंडळ | सदस्य सचिव |

**१२.** पात्र व्यक्ती/उद्योजक/संस्था यांची निवड करतांना पत्येक खेडयांच्या समूह /गटासाठी सुरुवातीस एक किंवा दोन व्यक्तीं किंवा संस्थेची निवड करण्यात यावी. मधमाशा वसाहती निर्माण करणे, त्यांचे योग्य प्रकारे संगोपन करणे, मध संकलन करणे व त्याच्या विक्रीबाबत शेतक-यांना मदत, मार्गदर्शन व प्रशिक्षण देण्याचे आवश्यक कौशल्य व क्षमता निवडलेल्या व्यक्ती /उद्योजक/ संस्था यांच्याकडे आहे याची समितीने खात्री करावी.

**निवडलेल्या व्यक्तिस / संस्थेच्या कर्मचा-यांस प्रशिक्षण :**

**१३.** मधमाशांचे प्रजनन करण्यासाठी तसेच प्रशिक्षण केंद्र चालविण्यासाठीचे प्रशिक्षण प्रामुख्याो महाबळेश्वर येथिल संशोधन, प्रशिक्षण आणि विस्तार केंद्रात देण्यात यंईल. या योजनेंतर्गत निवडलेल्या व्यक्ती, उद्योजक लाभार्थी व संस्थेने नामनिर्देशीत केलेल्या व्यक्तीस असे केंद्र चालविण्यासाठी सोबतचे **परिशिष्ट 'अ'** प्रमाणे अभ्यासक्रमाचा समावेश असलेले किमान २५ दिवसांचे मोफत प्रशिक्षण देण्यात यावे. प्रशिक्षणासाठी प्रती लाभार्थी रु.५०००/- या मर्यादेपर्यंत खर्च करता येईल.खर्चाचा तपशील खालील प्रमाणे राहील.

| अ.क्र. | तपशील | प्रतिव्यक्ती अंदाजीत खर्च<br>**रक्कम रुपये** |
|---|---|---|
| अ) | संस्थेकरिता प्रशिक्षण साहित्य व इतर सुविधा | ७५०/- |
| ब) | निवास व भोजन व्यवस्था२५ दिवसप्रतिदिनी प्रतिव्यक्ती रु.१५०/-प्रमाणे | ३७५०/- |
| क) | प्रशिक्षकाचे प्रवास/मानधन/इतर खर्च रु.५००/- प्रतिलाभार्थी | ५००/- |
| | **एकूण** | **रु ५०००/-** |

**१४**. या प्रशिक्षण कालावधीत निवडलेल्या व्यक्ती/उद्योजक/संस्थाउपरोक्त परिच्छेद १० मध्ये नमूद केल्याप्रमाणे आवश्यक पात्रता व कौशल्य आहे किंवा नाही याची शहानिशा करण्यात यावी. निवडण्यात आलेल्या व्यक्ती किंवा संस्थांमार्फत, निवडण्यात आलेल्या चालकांमार्फत प्रत्यक्ष वसाहतीचे प्रजनन करता येते किंवा नाही, तसेच मधमाशा पालन व्यवसाय करु इच्छिणा-या लाभार्थ्यांना प्रशिक्षण / मार्गदर्शन देण्याकरिता कौशल्य आहे किंवा नाही याबाबत खातरजमा करण्यात यावी. या केंद्रावर प्रशिक्षीत केलेला लाभार्थी हा यासाठी सक्षम आढळला नाही तर अशा केंद्रला पुढील कोणतेही सहाय्य दिले जाणार नाही. अशा प्रशिक्षण केंद्रातील लाभार्थ्यांपैकी किमान ७५ टक्के लाभार्थ्यांनी यशस्वीरीत्या प्रशिक्षण पूर्ण करुन मधमाशा वसाहती प्रजनन,पालन करणारे उद्योजक व मार्गदर्शक होणे अपेक्षित आहे.

**साहित्य पुरवठा :**

**१५.** या योजनेंतर्गत लाभ घेऊ इच्छिणा-या लाभार्थ्यांसाठी तसेच मधमाशा वसाहती प्रजनन केंद्रासाठी लागणारे साहित्य आणि मधमाशा वसाहती प्रजनन केंद्राकडून उपलब्ध होणारे साहित्य विचारात घेऊन दरवर्षी लागणा-या मधपेटया, मधयंत्रे, राणीमाशी पैदास यंत्र इत्यादी साहीत्याची संख्या निश्चीत करुन त्याचा पुरवठा करण्यासाठी जाहीर निविदाव्दारे मंडळामार्फत साहित्याचे दर व पुरवठादार निश्चित करावेत. निश्चित केलेल्या पुरवठादाराकडून निश्चित केलेल्या दराने साहित्याची खरेदी करावी. या ाािश्चित केलेल्या दराा्सार प्रकल्प किंमत ाािश्चित करण्यात यावी.

**१६.** प्रशिक्षित लाभार्थ्यास/संस्थेस सोबतचे **परिशिष्ट 'क'** मध्ये नमूद केलेल्या साहित्यासह किमान ५० व कमाल १०० वसाहतीसह सातेरी/मेलीफेरा मधपेटया २५ टक्के अनुदानावर पुरविण्यात याव्यात. प्रशिक्षीत लाभार्थ्यास बँकेतून कर्ज मिळविण्याकरीता आवश्यक ती मदत करण्यात यावी व त्याला प्राधीकृत पुरवठादाराकडून साहित्य थेट खरेदी करण्याससुध्दा मुभा देण्यात यावी. पुरविण्यात येणा-या साहित्याची किंमत ही प्रकल्प किमंत म्हणून निश्चित करुन तेवढया किंमतीच्या ७५ टक्के रक्कम मंडळाकडे भरल्यानंतर साहित्याचे वाटप करण्यात यावे. थेट खरेदी केल्यास त्याला खरेदी केलेले साहित्य किंवा प्रकल्प किमंत यापैकी जी रक्कम कमी असेल त्याच्या २५ टक्के अनुदान या योजनेतून देण्यात यावे.

**घटक ४ : मधमाशापालन व्यवसाय करणा-या लाभार्थींची निवड,प्रशिक्षण व मार्गदर्शन**

**१७.** पश्चिम घाट विकास कार्यक्रम कार्यक्षेत्रातील १८ ते ४५ वर्षे वयोगटातील शेतकरी/शेतमजूर असलेल्या कोणत्याही व्यक्तीस मधमाशापालन व्यवसाय करता येईल. मधमाशापालन व्यवसायासाठी समूह दृष्टीकोन (Cluster Approach) ठेवून शक्यतो एकाच गावातील अथवा गावाच्या समुहातील लाभार्थ्याची जाहिरातीव्दारे अर्ज मागवून जिल्हास्तरीय समितीच्या मान्यतेने निवड करावी. अपवादात्मक परिस्थितीमध्ये वेगवेगळया गावातील लाभार्थ्याची निवड करण्यास हरकत नाही.

**१८.** लाभार्थ्यांचे अर्ज मागविणा-या प्रक्रियेस स्थानिक वर्तमान पत्रांतून मोठया प्रमाणावर प्रसिध्दी देण्यात यावी. निवड करतांना दारीद्रय रेषेखालील व्यक्ती/स्वंय सहाय्यता गट,महिला आणि संयुक्त वन व्यवस्थापन गट यांना प्राधान्य दयावे. त्याच बरोबर अल्प संख्याकांनाही पुरेसे प्रतिनिधीत्व देण्यात यावे. निवड समिती ही जिल्हाधिकारी/मुख्य कार्यकारी जिल्हा परिषद यांच्या सम्मतीने गठीत करण्यात यावी.

**लाभार्थ्याची निवड, प्रशिक्षण व केंद्र चालकामार्फत मार्गदर्शा :**

**१९.** निवडलेल्या लाभार्थ्याना मंडळाच्या प्रशिक्षण केंद्रावर अथवा मंडळाने निश्चीत केलेल्या मधमाशा प्रजनन करणा-या उद्योजकाच्या केंद्रावर अथवा अन्य प्रशिक्षण केंद्रावर मधमाशापालन व्यवसायाशी निगडीत मोफत प्रशिक्षण देण्यात यावे. याकरिता प्रति लाभार्थी रु.२०००/- या प्रमाणे प्रशिक्षणाचा खर्च सदर केंद्र चालकास /संस्थेस /मंडळास देण्यात यावा. खर्चाचा तपशील खालील प्रमाणे राहील.

| अ.क्र. | तपशील | प्रतिव्यक्ती अंदाजीत खर्च रक्कम रुपये |
|---|---|---|

अ) केंद्र चालकाचे प्रशिक्षण साहित्य व इतर सुविधा ७५०/-

ब) निवास व भोजन व्यवस्था१० दिवस प्रतिदिनी प्रतिव्यक्ती १०००/-
रु.१००/-प्रमाणे

ब) प्रशिक्षकाचे प्रशिक्षकाचे प्रवास/मानधन/इतर खर्च २५०/-
रु.२५०/- प्रतिलाभार्थी

**एकूण रु. २०००/-**

**वित्तीय संस्थेकडून कर्ज / अनुज्ञेय साहित्य**

**२०** प्रशिक्षीत लाभार्थ्यास **परिशिष्ट 'ड'** मध्ये नमूद केल्याप्रमाणे किमान ५ व कमाल २० मधपेटया/वसाहतीसह मधपेटया/ (सातेरी/ मेलीफेरा) , एक मधयंत्र व अन्य साहित्य २५ टक्के सवलतीच्या दराने पुरविण्यात यावे. साहित्याचे वाटप करण्यापूर्वी लाभार्थ्याने त्याच्या हिश्याची २५ टक्के रक्कम मंडळाकडे भरावी अथवा लाभार्थ्याने मधमाशापालन व्यवसायासाठी बँकेकडून / वि-तीय संस्थेकडून कर्ज घेतले असल्यास २५ टक्के रक्कम भरण्यास सदर बँक / वि-तीय संस्था तयार असल्याचे हमीपत्र द्यावे. मधमाशा पालन व्यवसाय करणा-या लाभार्थ्यास जास्तीत जास्त रु.१०,०००/- अथवा परिछेद १५ नुसार निश्चित केलेल्या प्रकल्प किंमतीच्या २५ टक्के यापैकी कमी असणारी रक्कम अनुदान म्हणून अनुज्ञेय राहील.

**.२१.** मधमाशापालन या व्यवसायासाठी राष्ट्रीयकृत, व्यापारी तसेच सहकारी बँका, पतपेढया इत्यादीकडून लाभार्थ्यांना मध्यम मुदतीचे कर्ज घेता येईल. योजनेचा लाभ घेण्यासाठी कर्ज घेऊ इच्छिणा-या प्रशिक्षीत लाभार्थ्यांची कर्ज प्रकरणे संबंधीत जिल्हा ग्रामोदयोग अधिका-यमार्फत वि-तीय संस्थांकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावीत. संबंधीत लाभार्थ्याची प्रकल्प किमंत विचारात घेताना लाभार्थ्याने प्रशिक्षण पूर्ण केल्याची खात्री करुन प्रकल्प किमंतीच्या ७५ टक्के पर्यन्त कर्ज मंजूर करण्यासाठी जिल्हा ग्रामोदयोग अधिका-याने संबंधीत वि-तीय संस्थेस शिफारस करावी. जिल्हा ग्रामोदयोग अधिका-याने शिफारस केल्याप्रमाणे संबंधीत वि-तीय संस्थांनी कर्ज मंजूर करण्यास हरकत नाही. .प्रशिक्षित लाभार्थ्यास मधमाशापालन व्यवसायासाठी अनुज्ञेय असलेले साहित्य खरेदी करण्यासाठी लागणारी एकूण किंमत ही लाभार्थ्याची प्रकल्प किंमत म्हणून समजण्यात यावी. सदरची योजना सुवर्णजयेंती ग्रामस्वरोजगार योजनेंतर्गत सुध्दा राबविता येईल. मात्र त्यासाठी त्या येंजनेतील तरतूदीनुसार अनुदान अनुज्ञेय राहील

**मधमाशा वसाहती प्रजनन पालन करणारे उद्योजक व मार्गदर्शक यांची दायित्वे**

**२२**. मधमाशापालन व्यवसाय करणा-या व्यक्तींना त्यांचा व्यवसाय यशस्वी होण्यासाठी सतत मार्गदर्शन करणे आवश्यक असल्याने मधमाशा वसाहती प्रजनन व मार्गदर्शक यांनी या व्यक्तींना कमीतकमी एक वर्षासाठी मार्गदर्शन करावे. उद्योजकाने अशा व्यक्तींना मार्गदशन करावे. मधमाशापालीन व्यवसाय करणा-या व्यक्तीने गोळा केलेला मध संकलीत करुन त्यावर प्रक्रिया करणे तसेच विक्री करण्याची व्यवस्थाही मधमाशा वसाहती प्रजनन उद्योजकाने /संस्थेने करावी. सतत एका व्यक्तीला वर्षभर यशस्वी मार्गदर्शन केल्यास आणि अशा व्यक्तींनी मधमाशापालन व्यवसाय यशस्वीरित्या चालू ठेवल्यास केंद्र चालकास प्रत्येक यशस्वी लाभार्थ्यामागे रु.१०००/- या प्रमाणे मानधन देण्यात यावे. यशस्वी लाभार्थीसाठी खालील ाकिष पुर्ण करणे आवश्यक राहील.

अ) लाभार्थीस आुदाावर पुरविलेल्या मधपेटयापैकी मधमाशांच्या वसाहती ठेऊन संगोपन करुन त्यापैकी किमान ७५% जगविल्या पाहिजेत.

ब) लाभार्थीस आुदाावर पुरविलेल्या प्रतिवसाहतीमागे किमान ७ किलोग्रॅम मधाचे उत्पादन पहिल्या वर्षी होणे आवश्यक राहील.

**२३**. मधमाशापालन व्यवसाय करणा-या व्यक्तीने गोळा केलेला मध संकलीत करुन त्यावर प्रक्रिया करणेतसेच विक्री करण्याची व्यवस्थाही मधमाशा वसाहती प्रजनन उद्योजकाने /संस्थेने करावी.

**इतर सवलती**

**२४.** मध गोळा करण्यासाठी मधमाशांाा फुलोरा आवश्यक असतो. राज्यातील काही भागामध्ये रब्बी व काही भागामध्ये खरीप पिके घेण्यात येतात. मात्र उन्हाळयामध्ये फुलोरा उपलब्ध होत नसल्याने मधमाशा वसाहतीचे फुलोरा असलेल्या शेतामध्ये अथवा जंगलामध्ये स्थलांतर करावे लागते. शासनाच्या मालकीच्या जंगलामध्ये /वनामध्ये या योजनेतील लाभार्थ्यांना मधमाशांचे स्थलांतर करण्यास अनुमती राहील. मात्र लाभार्थ्यांनी जंगलातील झाडांची अथवा जंगलातील कोणत्याही वस्तूस हानी पोहाचणार नाही, याची दक्षता घ्यावी.

**प्रशासकीय, प्रचार-प्रसिध्दी व जनजागृती**

**२५.** एकात्मिक मधमाशापालन व मध उदयोग योजनेची परिणामकारकरित्या अंमलबजावणी करणेसाठी तज्ज्ञ सल्लागारांची नियुक्ती करणे, लाभार्थ्यांची निवड करणे, त्यांना प्रशिक्षणासाठी पाठविणे, आवश्यक ते साहित्य उपलब्ध करुन देणे,मध उदयोंगाचा प्रचार व प्रसिध्दी करणेसाठी वेगवेगळया कार्यशाळा, शिबीरे, प्रात्यक्षिके आयोजित करणे तसेच प्रगतीशिल मधपाळांसाठी बक्षीस योजना राबविणे, त्याच्या सहली आयोजित करणे इ. कामे मंडळामार्फत करावी लागणार असल्याने त्यासाठी होणारा खर्च या योजनेंतर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा. मात्र सदर खर्च उपलब्ध होणा-या अनुदानाच्या ५ टक्के इतक्या मर्यादेपर्यन्त करण्यात यावा.

२६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणनक सांकेतांक २०१००४२०१९३११६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( सुनील सोनी )**
**प्रधान सचिव**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
३) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
४) सचिव, महाराष्ट्र विधाामंडळ सचिवालय, मुंबई,
५) मुख्य सचिव,
६) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधाा सचिव/सचिव,
७) सर्व विभागीय आयुक्त,
८ ) महालेखापाल १/२ , (लेखा व आज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर ,
९ ) महालेखापाल १/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर,
१०) सर्व जिल्हाधिकारी,
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१२) नियाोजन विभागातील सर्व सह सचिच/ उप सचिव
१३) आयुक्त, मत्स्यव्यवसाय, तााारापोरवाला मत्स्यालय, नेताजी सुभाषचंद्र मार्ग, चर्नी रोड,मुंबई-४००००२
१४) आयुक्त, पशुसंवर्धन, कृषि संचालनालय, मध्यवर्ती इमारत, पुणे ४११००१
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, खादी व ग्रामोद्योग मंडळ, १९/२१, माोहरदास रस्ता, फोर्ट ,मुंबई-४००००१
१६) संचालक, हातमाग यंत्रमाग, वस्त्रोद्योग व रेशीम संचालनालय, म.रा.हातमाग महामंडळ, उमरेड रोड, - नागपूर ४४०००९
१७) संचालक, मृदसंधारण व पाणलोटक्षेत्र व्यवस्थापन, कृषि आयुक्तालय,मध्यवर्ती इमारत,पुणे४११००१
१८) संचालक,सामाजिक वनीकरण, कृषिसंचालनालय, मध्यवर्ती इमारत, पुणे ४११००१
१९) संचालक,फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, मध्यवर्ती इमारत पुणे ४११००१
२०) महाव्यवस्थापक (वित्त व प्रशासा), महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (मेडा), म्हाडा कमर्शिअल कॉम्पलेक्स,सर्वे ां.१६/१/ए,फेज-१, त्रिदलसमोर, येरवडा, पुणे ४११ ००६.
२१) मुख्य वासंरक्षक (प्रादेशिक), पुणे वावृत्त, पुणे ४११ ०३७
२२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा ४१५ ००११.
२३)अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे ४२२ ००१
२४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर ४१६ ००३
२५) अधीक्षक अभियतां,सार्वजनिक बांधकाम मंडळ, विशेष प्रकल्प मंडळ,कोकण भवन,नवी मबुई- ६१४
२६) अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे ४०० ६०१
२७) अधीक्षक अभियंता,लघु पाटबंधारे मंडळ (स्थानिक स्तर),कोपरी वसाहत,सिंचन भवन,ठाणे ४०० ६०१
२८) अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे मंडळ (स्थानिक स्तर), भवानी चौक ,नाशिक ४२२ ००२
२९ )सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३०) निवड नस्ती, का. १४८३

## परिशिष्ट 'अ'

## मधमाशा प्रजनन तथा प्रशिक्षण केंद्र

## आवश्यक सुविधा

## मधमाशा वसाहती प्रजनन तथा प्रशिक्षण केंद्र

## केंद्रचालकास प्रशिक्षण

## अभ्यासक्रम

प्रशिक्षणाच्या ठिकाणी प्रशिक्षण हॉल व किमान ३० प्रशिक्षणार्थी राहण्यासाठी तसेच त्यांच्या भोजनासाठी सुयोग्य सुविधा असलेली किमान ५०० चौ.फुट क्षेत्रफळाची इमारत उपलब्ध असावी याशिवाय प्रशिक्षणार्थींना बसण्यासाठी पुरेशी बाके ,संगणक, एल सी डी प्रोजेक्टर व मेलीफेरा आणि सातेरी या जातीच्या वसाहतीसह १० मधपेटया , सातेरी व मेलीफेरा प्रत्येकी १ मधयंत्र , स्वार्मनेट, बी व्हेल , हाईव्ह टूल, सुरी,धूरयंत्र ,राणी पैदास कार्यक्रमासाठी आवश्यक उपकरणे इत्यादी साहित्य उपलब्ध असावे.

**(कालावधी २५ दिवस)**

| अ.क्र | विषय |
|---|---|
| १ | मधमाशाचा इतिहास |
| २ | मधमाशा पालनाची सुरुवातीची पध्दत व प्रकार. त्याचे फायदे व तोटे. |
| ३ | मधमाशाच्या जाती |
| ४ | मधमाशाची वसाहत म्हणजे काय,वसाहतीतील घटक राणीमाशी, कामकरी माशी व मधमाशा.घटकांची शरीर रचना,महत्वाचे अवयव व कार्य घटकांचा जीवनक्रम,आयुष्य |
| ५ | मधमाशा पालनाचे साहित्य, त्याचे विविध भाग, रचना व उपयोग |
| ६ | राणी पैदास उपकरणे बार,फ्रेम,डिपींग रॉड,बश,निडल,बार्बो पंच, शुध्द मेण इत्यादी साहित्य,त्याची रचना उपयोग सहज राणी पैदास उपकरण |
| ७ | निर्सगातील वसाहती पकडणे(कॅप्चरींग) |
| ८ | मधुबनाच्या जागेची निवड व स्थापना करणे |
| ९ | मधमाशांच्या वसाहतीची तपासणी करणे |
| १० | स्वार्मिंग, गृहत्याग |
| ११ | वसाहतीचे विभाजन करणे |
| १२ | कृत्रिम राणी पैदास कार्यक्रम |
| १३ | मध हंगामातील व्यवस्थापन |
| १४ | वसाहतीचे स्थलांतर करणे(मायग्रेशन) |
| १५ | मधमाशाचे रोग व शत्रू , किटक नाशके,तृणनाशके यांची पिकावरील फवारणी व मधमाशांची घ्यावयाची काळजी. |
| १६ | मधमाशासाठी कृत्रिम खाद्य |
| १७ | मधमाशांना उपयुक्त वनस्पती |
| १८ | वनस्पती फुलो-यात येणारा महिना फुलो-याचे कॅलेण्डर.मधमाशाना उपयुक्त वनस्पतीची लागवड करणे. |
| १९ | मध निष्कासन ,साठवणे व निगा राखणे |
| २० | मधावर प्रक्रिया करणे (प्रोसेसिंग) |
| २१ | मेण तयार करणे |

| | |
|---|---|
| २२ | मधमाशांचा दंश उपाय उपचार व घ्यावयाची काळजी |
| २३ | स्ट्रीप तयार करणे. |
| २४ | फ्रेमीना तारा लावणे, सुपरमध्ये मेणपत्रा चिकटविणे सुपर देणे ,सुपर उतरविणे |
| २५ | स्थलांतरासाठी वसाहत पॅकींग करणे, स्थानीक स्थलांतर |
| २६ | खराब पोळयापासून मेण तयार करणे ,सूर्यतापी मेणयंत्र,मेणपत्रा तयार करणे. |
| २७ | मध प्रक्रिया व बाटली बंद करणे |
| २८ | वसाहत एकत्रीकरण(स्वार्मिंग,ग्राफटींग),वसाहत एकत्रीकरण(कागद पध्दत) |
| २९ | मधुबन वसाहत स्वार्मिंगची ओळख,हर्बोरिअम तयार करणे. |
| ३० | पराग पृथकरण,मध तपासणी |
| ३१ | मधु उद्योग सुरु करण्यासाठी पहाणी करणे |
| | वसाहतीची पोलन रीडींग तपासणी परागसंकलनाची पध्दत |
| ३३ | पी.डी.बी.चा वापर करुन ओढलेले सुपर्स सुरक्षित ठेवणे |
| ३४ | मधु वनस्पती ओळख |
| ३५ | परागीभवन कार्यक्रमासाठी वसाहतीचे व्यवस्थापन |
| ३६ | विविध मधमाशांना उपयुक्त वनस्पतीची लागवड/पहाणी करणे,मधपाळ भेटी. |
| ३७ | मधमाशापालन उप उत्पादन उदा.पराग, राजान्न,विष,रोंगण ,मेण इ. |

वरील अभ्यासक्रमामध्ये आवश्यकतेप्रमाणे पुरेशी प्रात्यक्षिके, क्षेत्र पहाणी, प्रशिक्षणार्थीकडून प्रत्यक्ष काम करुन घेणे इत्यादी बाबींचा समावेश करण्यांत यावा.

## परिशिष्ट ‘ब’

## मधमाशापालन व्यवसाय प्रशिक्षण केंद्र आवश्यक सुविधा व अभ्यासक्रम

प्रशिक्षणाच्या ठिकाणी प्रशिक्षण हॉल व किमान ३० प्रशिक्षणार्थी राहण्यासाठी तसेच त्यांच्या भोजनासाठी सुयोग्य सुविधा असलेली किमान ५०० चौ.फुट. क्षेत्रफळाची इमारत उपलब्ध असावी याशिवाय प्रशिक्षणार्थींना बसण्यासाठी पुरेशी बाके ,संगणक एल सी डी प्रोजेक्टर व मेलीफेरा आणि सातेरी या जातीच्या वसाहतीसह १० मधपेटया , सातेरी व मेलीफेरा प्रत्येकी १ मधयंत्र , स्वार्मनेट, बी व्हेल , हाईव्ह टूल सुरी,धूरयंत्र ,राणी पैदास कार्यक्रमासाठी आवश्यक उपकरणे इत्यादी साहित्य उपलब्ध असावे.

### मधमाशापालन व्यवसायपूर्व प्रशिक्षण
### (प्रशिक्षण कालावधी १० दिवस )

| अ.क्र | विषय |
|---|---|
| १ | मधमाशाचा इतिहास |
| २ | मधमाशा पालनाची सुरुवातीची पध्दत व प्रकार. त्याचे फायदे व तोटे. |
| ३ | मधमाशाच्या जाती |
| ४ | मधमाशाची वसाहत म्हणजे काय,वसाहतीतील घटक राणीमाशी, कामकरी माशी व मधमाशा.घटकांची शरीर रचना,महत्वाचे अवयव व कार्य घटकांचा जीवनक्रम,आयुष्य |
| ५ | मधमाशा पालनाचे साहित्य, त्याचे विविध भाग, रचना व उपयोग |
| ६ | राणी पैदास उपकरणे बार,फ्रेम,डिपींग रॉड,ब्रश,निडल,बार्बो पंच, शुध्द मेण इत्यादी साहित्य,त्याची रचना उपयोग सहज राणी पैदास उपकरण |
| ७ | निर्सगातील वसाहती पकडणे(कॅप्चरींग) |
| ८ | मधुबनाच्या जागेची निवड व स्थापना करणे |
| ९ | मधमाशांच्या वसाहतीची तपासणी करणे |
| १० | स्वार्मिंग, गृहत्याग |
| ११ | वसाहतीचे विभाजन करणे |
| १२ | राणी पैदास व वसाहत पैदास कार्यक्रम |
| १३ | मध हंगामातील व्यवस्थापन |
| १४ | मधमाशांचा दंश उपाय उपचार व घ्यावयाची काळजी |
| १५ | मधमाशापालनातील उप उत्पादने |
| १६ | परागीभवन कार्यक्रमासाठी वसाहतींचे व्यवस्थापन |

## व्यवसाय सुरु केल्यानंतर प्रशिक्षण वेळोवेळी/सतत मार्गदशन

| | |
|---|---|
| १ | वसाहतीचे स्थलांतर करणे(मायग्रेशन) |
| २ | मधमाशाचे रोग व शत्रू , किटक नाशके,तृणनाशके यांची पिकावरील फवारणी व मधमाशांची घ्यावयाची काळजी. |
| ३ | मधमाशासाठी कृत्रिम खाद्य |
| ४ | मधमाशांना उपयुक्त वनस्पती |
| ५ | वनस्पती फुलो-यात येणारा महिना फुलो-याचे कॅलेण्डर.मधमाशाना उपयुक्त वनस्पतीची लागवड करणे. |
| ६ | मध निष्कासन ,साठवणे व निगा राखणे |
| ७ | मधावर प्रक्रिया करणे (प्रोसेसिंग) |
| ८ | मेण तयार करणे |
| ९ | पीडीबी चा वापर ,सुपर देणे, सुपर उतरविणे, |
| १० | मधपाळ भेटी |

वरील अभ्यासक्रमामध्ये आवश्यकतेप्रमाणे पुरेशी प्रात्यक्षिके, क्षेत्र पहाणी, प्रशिक्षणार्थीकडून प्रत्यक्ष काम करुन घेणे इत्यादी बाबींचा समावेश करण्यांत यावा.

## परिशिष्ट 'क'

## मधमाशा वसाहत प्रजनन आणि प्रशिक्षण केंद्रासाठी अनुज्ञेय साहित्य

| अ. क्र. | तपशील | संख्या | अंदाजित किमंत |
|---|---|---|---|
| १) | किमान ७ पोळे असलेल्या वसाहतींसह व स्टँड ॲल्युमिनियम वाटयांसह आयएसआय मानकानुसार मेलीफेरा जातीच्या मधपेटया रु.३७०० प्रतिपेटी | ५० ते १०० | ३,७०,०००/- |
| २) | स्टेनलेस स्टीलचे मधयंत्र आय एस आय मानकाचे - | १ | ८,०००/- |
| ३) | रिकाम्या २० मधपेटया (न्युक्लीअस/मेलीफेरा/सातेरी ) रु.१५००/- प्रतिपेटी | २० | ३०,०००/- |
| ४) | राणी पैदास उपकरणे | १ संच | २०,०००/- |
| ५) | स्वार्मनेट,बीव्हेल हाईव्ह टूल, सुरी इ. | प्रत्येकी १ | १,०००/- |
| ६) | स्टेनलेस स्टील भांडी (मध साठविणेसाठी) | नग १० | ६,०००/- |
| ७) | वजन काटा | १ | १,०००/- |
| ८) | मध तपासणी संच | १ | ५,०००/- |
| | **एकूण किमंत** | | ४,४१,०००/- |

## परिशिष्ट 'ड'

## मधमाशापालन व्यवसाय अनुज्ञेय साहित्य

| अ. क्र. | तपशील | संख्या | अंदाजित किमंत |
|---|---|---|---|
| १) | किमान ७ पोळे असलेल्या वसाहतींसह व स्टँड ॲल्युमिनियम वाटयांसह आयएसआय मानकानुसार मेलीफेरा जातीच्या मधपेटया रु.३७०० प्रतिपेटी | १० | ३७,०००/- |
| २) | स्टेनलेस स्टीलचे मधयंत्र आय एस आय मानकाचे | १ | ८,०००/- |
| ३) | स्वार्मनेट,बीव्हेल हाईव्ह टूल, सुरी इ. | प्रत्येकी १ | १,०००/- |
| ४) | स्टेनलेस स्टील भांडी (मध साठविणेसाठी) | नग २ | १,२००/- |
| | **एकूण किंमत** | | ४७,२००/- |